**राज्यातील जिल्हा मुख्यालय ठिकाणी तसेच मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर व औरंगाबाद करिता एकूण ३७ eSewa केंद्र सुरु ठेवण्यासाठी येणाऱ्या रु.७९,०८,०००/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.८४/कार्या. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०२४.

**संदर्भ:-** १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp./४६०/२०२३, दिनांक ०१.११.२०२३.
२) दिनांक १४.०३.२०२४ रोजीच्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी राज्यातील जिल्हा मुख्यालय ठिकाणी तसेच मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर व औरंगाबाद खंडपीठात असे एकूण ३७ eSewa केंद्र सुरु ठेवण्यासाठी येणाऱ्या खर्चास रु.७९,०८,०००/- इतक्या रक्कमेच्या प्रस्ताव संदर्भ क्र. १ अन्वये शासनास सादर केला होता. यानुषंगाने सदर प्रस्ताव विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १४.०३.२०२४ च्या बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता, त्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार इंटरनेट कनेक्टीव्हीटी व तांत्रिक मनुष्यबळ करिता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील जिल्हा मुख्यालय ठिकाणी तसेच मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर व औरंगाबाद खंडपीठकरिता एकूण ३७ eSewa केंद्र सुरु ठेवण्यासाठी येणाऱ्या **रु.७९,०८,०००/-** (अक्षरी रु. एकोणऐंशी लक्ष आठ हजार फक्त) इतक्या खर्चास याद्वारे प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. सदर निधी महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (जे ०००२) यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयानाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तावांतर्गत खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) "१७ संगणक खर्च" या लेखाशिर्षाखालील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१९११०३१२६०१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2024.03.19 11:13:03 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे , ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती/का. ७